**हागणदारीमुक्त गावांची पडताळणीचे मार्गदर्शक तत्वे निश्चित करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्वभामि - २०१५ /प्र.क्र.१८१/पा.पु ०८**

**७ वा मजला, गोकुळदास तेजपाळ रुग्णालय संकुल इमारत**

लोकमान्य टिळक मार्ग,क्राफर्ड मार्केट

तारीख: २७ ऑक्टोबर, २०१५

**वाचा**

सहसचिव ,स्वच्छ भारत मिशन-ग्रामीण,पेयजल व स्वच्छता मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्रमांक S-११०११/३/२०१५-SBM ,दि.९ जून,२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना**

महात्मा गांधी यांच्या दिनांक २ ऑक्टोबर, २०१९ रोजी साजरा होणा-या १५० व्या जयंती निमित्ताने संपूर्ण देश "स्वच्छ भारत" करण्याच्या उद्देशाने मा. पंतप्रधान महोदयांनी दि.२ ऑक्टोबर, २०१४ रोजी स्वच्छ भारत मिशन-ग्रामीण या अभियानाचा शुभारंभ केला आहे. या महत्वाकांक्षी कार्यक्रमांतर्गत राज्य हागणदारीमुक्त करावयाचे आहे

स्वच्छ भारत मिशन- ग्रामीण ची अंमलबजावणी सुरू झाल्यानंतर डिसेंबर,२०१४ मध्ये सदर अभियानाचे मार्गदर्शक तत्वे केंद शासनाने निश्चित केले आहेत. सदर मार्गदर्शक तत्वांच्या आधारे राज्य हागणदारीमुक्ती च्या पूर्ततेसाठी सातत्याने प्रयत्नशील आहे. तथापि, वरिल मार्गदर्शक तत्वांमध्ये हागणदारीमुक्त ग्रामपंचायतींच्या पडताळणीसाठी निश्चित मार्गदर्शक तत्वांचा समावेश नसल्याने ग्रामपंचायतीसाठी हागणदारीमुक्तीचा दर्जा ठरविणे शक्य होत नव्हते. आता, केंद्र शासनाने त्यांच्या वरील दि.९ जून, २०१५ पत्रान्वये हागणदारीमुक्त या स्थितीची व्याख्या केली असून हागणदारीमुक्त ग्रामपंचायतीची पडताळणी कारण्यासाठी सर्वसाधारण मार्गदर्शक तत्वे निश्चित केली आहेत. सदर मार्गदर्शक तत्वे ही दिशा निर्देशक असून त्या आधारे राज्यांनी परिस्थितीपूरक हागणदारीमुक्त गावांच्या पडताळणीसाठी स्वतंत्र मार्गदर्शक तत्वे निश्चित करणे आवश्यक आहे.अशी स्वतंत्र मार्गदर्शक तत्वे राज्यांनी निश्चित करून त्या आधारे राज्यातील हागणदारीमूक्त ग्रामपंचायतींची पडताळणी दि.३१ डिसेंबर, २०१५ पर्यंत पूर्ण करण्याचे स्पष्ट निदेश केंद्र शासनाने त्यांच्या दि.८ ऑक्टोबर, २०१५ च्या पत्रान्वये राज्यशासनास दिले आहेत.केंद्रशासनाच्या सदर निदेशास अनुसरुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

स्वच्छ भारत मिशन-ग्रामीण या अभियानांतर्गत संपूर्ण राज्य हागणदारीमुक्त करण्याचे उद्दिष्ट विहित कालमर्यादेत गाठणे शक्य व्हावे याद्दष्टीने केंद्र शासनाचे वरिल निदेश विचारात घेऊन राज्यातील हागणदारीमुक्त ग्रामपंचायतीच्या पडताळणीसाठी राज्यशासनाने स्वतंत्र त्रीस्तरीय पडताळणी प्रक्रिया निश्चित केली असून सदर प्रक्रिया सोबतच्या प्रपत्रात विस्ताराने विशद करण्यात आली आहे. या प्रकियेमध्ये अंतर्भूत असलेल्या विविध समित्यांचे प्रारूप तसेच तपासणी/पडताळणी सूचींचे नमूने त्यात समाविष्ट करण्यात आले आहेत.सदर त्रीस्तरिय पडताळणी प्रक्रिया हि हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी साठीच्या मार्गदर्शक तत्वांचा भाग असून त्यांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

केंद्र शासनाच्या निदेशानुसार राज्यातील हागणदारीमुक्त ग्रामपंचायतींची पडताळणी दि. ३१ डिसेंबर, २०१५ पर्यंत पूर्ण करणे अत्यावश्यक असल्याने अशी पडताळणी करण्यास जबाबदार असलेल्या सर्व घटकांनी सोबत जोडलेल्या प्रपत्रातील कार्यपध्तीनुसार सदर पडताळणी विहीत कालमर्यादेत पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी. सदर प्रकीया राबविताना काही समस्या उद्भवल्यास संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांचे सहाय्य घेता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१७३१४५३७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: CN = Rajesh Kumar, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2015.10.27 19:57:02 +05'30'

**(राजेश कुमार)**
प्रधान सचिव

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
६. मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता मंत्रालय, मुंबई

८. सचिव, ग्रामविकास मंत्रालय, मुंबई
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१० .विभागीय आयुक्त,(सर्व)
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मंत्रालय, मुंबई
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,(सर्व)
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. संचालक वासो, बेलापूर, नवी मुंबई
१५. प्रबंधक, नाबार्ड, पुणे
१६ .वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. नियोजन विभाग, मंत्रालय , मुंबई
१८. पा.पु. व स्व.विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई
१९. कक्ष अधिकारी (पापु-१६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई.
२०. निवड नस्ती, पापु. ०८

# प्रपत्र

## स्वच्छ भारत मिशन
## पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभाग,महाराष्ट्र शासन
## हगणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रिया

### हागणदारी मुक्त ग्रामपंचायत – त्रिस्तरीय पडताळणी

**पार्श्वभूमी:** जवळपास गेल्या दोन दशकापासून स्वच्छते संदर्भात देशव्यापी उपक्रमांची अंमलबजावणी करताना एक बाब प्रकर्षाने समोर आली, ती म्हणजे समाजात स्वच्छता विषयक उपक्रमांचा अनुकूल परिणाम पहायचा असेल तर स्वच्छतेच्या इतर घटकापेक्षा मानवी विष्ठेचे सुयोग्य व्यवस्थापन अत्यंत महत्वाचे ठरते. या अनुभवाला अनुसरून स्वच्छ भारत मिशन अंतर्गत शौचालयांच्या संख्येपेक्षा संपूर्ण ग्रामपंचायत क्षेत्र हागणदारी मुक्त करण्यावर भर दिला गेला असून मिशनच्या प्रगती अहवालात हागणदारी मुक्त ग्रामपंचायतीची संख्या हा एक प्रमुख मापदंड समजल्या गेला आहे.महाराष्ट्र राज्यात निर्मल ग्राम पडताळणी प्राप्त ग्रामपंचायतीची संख्या इतर राज्यांच्या तुलनेने जरी खूप मोठी असली तरी हागणदारी मुक्त ग्रामपंचायतीची संख्या मात्र त्या तुलनेत अत्यंत कमी आहे.स्वच्छता उपक्रमाचा आरोग्यावर अनुकूल परिणाम मिळवण्याच्या दृष्टीने ही बाब निश्चितच गंभीर आहे. या पार्श्वभूमीवर राज्यातील अधिकाधिक ग्रामपंचायतीनी आपापले क्षेत्र हागणदारी मुक्त करण्यात पुढाकार घेवून त्यातील सातत्य टिकवावे यासाठी त्यांना प्रोत्साहित करणे गरजेचे आहे. ग्रामपंचायतीना हे प्रोत्साहन मिळावे आणि हागणदारी मुक्त दर्जा प्राप्त करणाऱ्या ग्रामपंचायतींच्या कामाची दाखल घेतली जावी या दुहेरी हेतूने हागणदारी मुक्त ग्रामपंचायतीसाठी त्रिस्तरीय पडताळणी प्रस्तावित आहे.

**उद्देश:** राज्यातील अधिकाधिक ग्रामपंचायती हागणदारी मुक्त करण्याच्या व हागणदारी मुक्त स्थितीतील सातत्य टिकवण्याच्या प्रयत्नाला प्रोत्साहन देण्यासाठी त्रिस्तरीय पडताळणीचे प्रमुख उद्देश पुढील प्रमाणे आहेत.

- राज्यातील हागणदारीमुक्त दर्जा प्राप्त करणाऱ्या ग्रामपंचायतींच्या कामाची योग्य दखल घेणे
- राज्यातील ग्रामपंचायतीना आपले क्षेत्र हागणदारीमुक्त करण्यासाठी प्रोत्साहन देणे
- ग्रामपंचायतीचा हागणदारी मुक्त स्थिती सातत्याने टिकवून ठेवण्यातील पुढाकार वाढविणे.
- ग्रामपंचायत स्तरावर स्वच्छता क्षेत्रातील उपलब्धीची योग्य नोंद घेणे
- ग्रामपंचायत अंतर्गत स्वच्छता उपक्रम अंमलबजावणीत सकारात्मक स्पर्धा निर्माण करणे
- स्वच्छता उपक्रमात लोकप्रतिनिधीसह स्थानिक संस्था, समूह आणि लोकसहभाग वाढविणे
- हागणदारीमुक्ती सोबतच स्वच्छता संबंधी पुढील कामे हाती घेण्यासाठी व त्यातही सातत्य टिकवण्यासाठी ग्रामपंचायतीना प्रोत्साहन देणे.
- स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण ) अंतर्गत निर्माण होणाऱ्या स्वच्छता सुविधांचा दर्जा टिकविण्यासंबंधी जागरुकता निर्माण करणे.

- राज्यात स्वच्छता संबंधी अनुकूल वातावरण निर्माण करणे

**पात्रता निकष:** हागणदारीमुक्त ग्रामपंचायत त्रिस्तरीय पडताळणी राज्यातील सर्व ग्रामपंचायतीसाठी खुली असेल आणि निर्मलग्राम पडताळणी प्राप्त आणि उर्वरित अशा सर्व ग्रामपंचायती या पडताळणीत सहभागी होवू शकतील. हागणदारीमुक्त ग्रामपंचायत दर्जा राज्याच्या पाणी व स्वच्छता विभागाने हागणदारीमुक्त ग्रामपंचायती संदर्भात निर्धारित केलेल्या तीन वेगवेगळ्या टप्प्यासाठी हागणदारीमुक्त दर्जा दिला जाईल. वर्षातून एकदा या पडताळणीची प्रक्रिया राबविली जाईल. या योजेनेत सहभागी होण्यासाठी ग्रामपंचायतीने हागणदारीमुक्त ग्रामपंचायती संदर्भात राज्याच्या पाणी व स्वच्छता विभागाने निर्धारित केलेल्या तीन टप्प्यातील निकषांपैकी किमान पहिल्या टप्प्यातील निकष पूर्ण केलेले असावेत आणि त्या निकषांची किमान सहा महिन्यापासून सातत्यपूर्ण अंमलबजावणी होत असावी. टप्पा दोन आणि टप्पा तीन अंतर्गत पडताळणीसाठी त्या त्या टप्प्यातील निकष पूर्ण केलेले असावेत. ग्रामपंचायतीसाठी पडताळणी प्रक्रियेत सहभागाची पद्धती पुढील प्रमाणे असेल.

- हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रियेत सहभाग घेण्यासाठी ज्या टप्प्यावरील पुरस्कारासाठी सहभाग घ्यावयाचा आहे त्या टप्प्यासाठी हागणदारीमुक्त ग्रामपंचायती घोषित करण्यासंदर्भात राज्याच्या पाणी व स्वच्छता विभागाने निर्धारित केलेले निकष पूर्ण केले असल्याचा ग्रामसभेचा ठराव
- हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रियेत सहभाग घेण्यासाठी ग्रामसभेची मंजुरी देणारा ठराव
- ग्रामसभेने मंजूर केलेला ठरावासह जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनकडे रीतसर प्रस्ताव सादर करणे.
- आंतरजिल्हा त्रयस्थ/ जिल्हा मुख्य साधन संस्थेकडून छायाचित्रासह व छायाचित्रणासह पडताळणी व शिफारस (संबंधित विभागांतर्गत)
- आंतरजिल्हा त्रयस्थ/ जिल्हा मुख्य साधन संस्थेकडून शिफारस केलेल्या प्रस्थावापैकी १० % प्रस्तावांची आंतरतालुका गटविकास अधिकाऱ्या कडून पडताळणी ( संबंधित जिल्हयाच्या अंतर्गत )
- जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत हागणदारीमुक्त पडताळणी प्रस्ताव समितीकडून छाणनी. (छाणनी समितीची रचना प्रपत्र 5 मध्ये पान क्र. 14 वर उपलब्ध आहे)
- जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत हागणदारीमुक्त पडताळणी प्रस्ताव छाननी समितीकडून मान्य प्रस्तावाची राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थाकडून गावच्या छायाचित्रासह व छायाचित्रणासह पडताळणी
- राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थाकडून छायाचित्रासह व छायाचित्रणासह मान्य प्रस्ताव पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) कडे सादर
- राज्याच्या पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाच्या अंतर्गत राज्यस्तरीय हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी सुकाणू समिती कडून मुख्य साधन संस्थानी मान्य केलेल्या प्रस्तावांचा आढावा व मंजुरी
- राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थाकडून मान्य प्रस्तावापैकी १० % प्रस्तावांची संबंधित विभागांतर्गत आंतरजिल्हा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील छाणनी तथा सुकाणू समितीकडून पडताळणी
- पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाकडून हागणदारीमुक्त दर्जा प्राप्त ग्रामपंचायतीच्या नावांची घोषणा

- पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाकडून राज्यस्तर कार्यक्रमात हागणदारीमुक्त ग्रामपंचायत दर्जा प्रमाणपत्र वितरण

**सन्मानपत्रासंबंधी:** हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी अंतर्गत ग्रामपंचायतीना प्रत्येक टप्प्यावर मिळणारे सन्मानपत्र त्या ग्रामपंचायतीने प्राप्त केलेल्या व सातत्याने टिकवलेल्या हागणदारीमुक्त दर्जासंबंधी आहे. भविष्यात दर्जा प्राप्त ग्रामपंचायतीने हा दर्जा गमावल्याचे लक्षात आल्यास राज्याचा पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभाग हे सन्मानपत्र आणि दर्जा परत घेवू शकेल.

हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रिया वर्ष २०१५-१६ पासून राज्यातील सर्व ग्रामपंचायती साठी खुली असून पडताळणी योजनेतील सहभागा संबंधी जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन यांच्याशी संपर्क साधावा.

**हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रस्तावासाठी तयार कराव्या लागणाऱ्या आवश्यक सूचना,टिपण आणि प्रपत्र**

- हागणदारीमुक्त ग्रामपंचायत (टप्पा १,२,३) निकष मार्गदर्शक सूचना
- सहभागी ग्रामपंचायतीने पडताळणीसाठी सादर करावयाचा प्रस्ताव- प्रपत्र
- हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रियेत सहभागाला ग्रामसभेची मंजुरी देणारा ठराव-प्रपत्र
- राज्याच्या पाणी व स्वच्छता विभागाने निर्धारित केलेले हागणदारी मुक्त ग्रामपंचायती संबंधीचे संबंधित टप्प्यासाठीचे निकष पूर्ण केला असल्याचा ग्रामसभेचा ठराव –प्रपत्र
- जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत छाननी समितीकडून हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रस्ताव छाननी – प्रपत्र
- हागणदारीमुक्त ग्रामपंचायत प्रस्ताव पडताळणी- राज्यस्तरीय मुख्य साधन संस्था ToR
- राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थाकडून प्रस्ताव पडताळणी - प्रपत्र
- राज्य पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाच्या अंतर्गत राज्यस्तरीय हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी सुकाणू समिती कडून प्रस्तावांचा आढावा व मंजुरी – प्रपत्र

-------------------------------------

## प्रपत्र १: हागणदारीमुक्त ग्रामपंचायत — मार्गदर्शक सूचना

स्वच्छ भारत मिशीनने २ ऑक्टोबर २०१९ पर्यंत संपूर्ण ग्रामीण भारत हागणदारी मुक्त करण्याच्या केलेल्या आवाहनाच्या पार्श्वभूमीवर राज्याच्या पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाने हा कार्यक्रम मिशन स्वरूपात राबवायचे ठरवले असून राज्यात २०१२ च्या पायाभूत सर्वेक्षणानुसार उर्वरित ५४ लक्ष कुटुंबांसाठी शौचालयांचे बांधकाम करून घेण्याचे निश्चित केले आहे.

गाव हागणदारी मुक्त करणे ही एक प्रक्रिया असून त्या प्रक्रियेचे वेगवेगळे टप्पे आहेत. तथापि, हागणदारी मुक्त गाव या संकल्पनेला नेहमीच गावातील वैयक्तिक शौचालयांच्या संख्येशी जोडल्या जाते हे आपण पाहतो. ही भूमिका नेहमीच योग्य ठरत नाही. या पार्श्वभूमीवर गाव हागणदारी मुक्त ठरविण्याच्या संकल्पनेकडे वेगळ्या दृष्टीने पाहून या प्रक्रियेचे हागणदारी मुक्त गावाचे निकष ठरवून त्या संबंधी काही टप्पे ठरवण्याची गरज आहे.

ग्रामीण भाग हागणदारी मुक्त करणे हे स्वच्छ भारत मिशनचे एक महत्वाचे उद्दिष्ट असले तरी हागणदारी मुक्त गावाची सविस्तर व्याख्या मात्र मार्गदर्शक सुचनामधून केलेली दिसून येत नाही. यामुळे हागणदारी मुक्त गावाची व्याख्या अंमलबजावणीतील विविध घटक आपापल्या पद्धतीने करू शकणार आहे. अर्थात स्वच्छ भारत मिशनने अलीकडेच हागणदारी मुक्त गाव दर्जा हा त्या गावातील शौचालयांच्या संख्येपलीकडचा विचार असल्याचे म्हटले आहे

### हागणदारी मुक्त ग्रामपंचायत व्याख्या

ग्रामीण भाग हागणदारी मुक्त करणे हे स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण)चे एक महत्वाचे उद्दिष्ट असले तरी हागणदारी मुक्त गावाची सविस्तर व्याख्या मात्र मार्गदर्शक सुचनामधून केलेली दिसून येत नाही. तथापी केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाच्या दि . ९ जून २०१५ च्या पत्रानुसार हागणदारी मुक्त गावाची खालील प्रमाणे संक्षिप्त व्याख्या दिली आहे —

१) गावामध्ये कोठेही मानवी विष्ठा दिसणार नाही
२) वैयक्तीक/सामुदायिक ठीकाणी सुरक्षित तांत्रिक पर्यायाद्वारे मानवी विष्ठेची योग्य प्रकारे विल्हेवाट लावण्यात आली आहे. (संदर्भ: शौचालयाची तांत्रिक मार्गदर्शिका —मे २०१५ )
या व्याख्येआधारे हागणदारीमुक्त ग्रामपंचायत म्हणजे अशी स्थिती ज्यात ग्रामपंचायत क्षेत्रातील सर्व कुटुंब, तात्पुरत्या स्वरूपात आलेली/राहणारी कुटुंब,संस्था यांच्या कडून सुरक्षित व शास्वत स्वरूपात मानवी विष्ठा व्यवस्थापन पद्धतीचा वापर आणि वैयक्तिक स्तरावर स्वच्छतेच्या सवयींचा अंगीकार.तसेच स्वच्छता विषयक या स्थितीतील सातत्य राखण्यासाठीची सामाजिक सनियंत्रण व्यवस्था उपलब्ध असणे होय.

२ ऑक्टोबर २०१९ पर्यंत राज्यातील सर्व गावे हागणदारी मुक्त करण्यासाठी केवळ वैयक्तिक शौचालयांच्या संख्येचा जरी विचार केला तरी महाराष्ट्र राज्यात दररोज किमान ३५०० शौचालयांचे बांधकाम करावे लागणार असून हे उदिष्ट खरेच मोठे आव्हान आहे. तळागाळातील समाजापर्यंत राज्य हागणदारी मुक्त करण्याची प्रेरणा निर्माण झाल्याशिवाय हे तुलनेने कठीण ध्येय गाठणे शक्य होणार नाही.

राज्यातील सर्व ग्रामपंचायतीनी  एकाच सलग प्रयत्नात आपले गाव हागणदारी मुक्त करावे अशी अपेक्षा ठेवणे योग्य ठरणार नाही.हागणदारी मुक्तीच्या प्रयत्नात शेवटी  शेवटी शिल्लक राहिलेले उदिष्ट साध्य करणे अनेकदा कठिण  होते आणि १-२ वर्ष काम करूनही बहुतांश ग्रामपंचायती संपूर्ण हागणदारी मुक्तीचे उदिष्ट गाठू शकत नाहीत असाच सर्वसाधारण अनुभव आहे.या पार्श्वभूमीवर ७०%,८०%  उदिष्ट प्राप्त करणाऱ्या ग्रामपंचायतींना प्रोत्साहित करण्याची आवश्यकता आहे.गाव हागणदारी मुक्त करण्याच्या प्रक्रियेतील विविध टप्प्यावर पोहोचण्यासाठी केलेल्या  प्रयत्नांची दाखल घेणे देखील गरजेचे आहे. गावातील प्रत्येक कुटुंबाकडे शौच्यालायाची सुविधा उपलब्ध होणे हे  अंतिम स्वप्न असले तरी गाव हागणदारी मुक्त झाल्याची घोषणा गावातील शौचालयांच्या संख्येबरोबर जोडणे योग्य ठरणार नाही.

स्वच्छ भारत मिशनच्या मार्गदर्शक सूचनानुसार गावपातळीवरील आधारभूत सर्वेक्षण प्रतिवर्षी अद्यावत करण्याची सुविधा उपलब्ध करून दिली जाणार आहे.या नुसार कुटुंब स्तरावर शौचालय उपलब्ध नसणाऱ्या कुटुंबांचा तपशील दरवर्षी बदलू शकेल. विविध कारणाने वाढलेली कुटुंब,विभक्त झालेली कुटुंब, पूर्वी सामुदायिक शौचालय सुविधा वापरणारी मात्र आता न वापरणारी कुटुंब या विविध कुटुंबामुळे गावात शौचालय नसणाऱ्या कुटुंबांची संख्या नेहमीच वाढत जाणार आहे.या पाश्र्वभूमोवर पूर्वीप्रमाणेच आपण शौचालयांची संख्या मोजत राहिलो तर ते योग्य ठरणार नाही.किती शौचालय आहेत या पेक्षा सर्व लोक शौचालय वापरतात का हाच खरेतर महत्वाचा निकष असू शकेल.

या टिपणाच्या  आधारे हागणदारीमुक्त ग्रामपंचायत उपक्रमात सह्भागी होणाऱ्या ग्रामपंचायतीना दोन वर्ष कालावधीत टप्प्या टप्प्याने हागणदारी मुक्त दर्जा देण्यासाठी पद्धती सुचवलेली आहे. ही पद्धती पुढील प्रमाणे.

अर्थात कुठल्याही ग्रामपंचायतीला या स्थिती पर्यंत पोहोचण्यासाठी विविध पातळ्या पार कराव्या लागतात.या प्रत्येक पातळीवर गरज असते ती प्रशासनाकडून दखल घेण्याची,मान्यता देण्याची आणि प्रोत्साहनाची. हागणदारी मुक्त ग्रामपंचायत उपक्रमात वरील पद्धतीचा समावेश करण्यासाठी पुढे जिल्हा अंतर्गत तीन पातळ्या सुचवल्या विचारार्थ आहेत.

**पातळी ०१ हागणदारी निर्मुलन  उत्सव ( ६-१२ महिने )**

- ग्रामसभेने मंजूर केलेला हागणदारी निर्मूलनाचा कृती आराखडा
- किमान ९०% कुटुंबांकडे शौचालयांची उपलब्धता
- शौचालयांच्या  उपलब्धतेहून अधिक महत्व  प्रत्येकाकडून नियमीत  वापर व देखरेख
- उघड्यावर शौच न आढळणे
- ग्राम पंचायत क्षेत्रात सार्वजनिक/समूह शौचालयांचा वापर होत असल्यास या  शौचालयाच्या दारावर वापर करणाऱ्या कुटुंबांची नावे लिहिलेली असावीत त्याच कुटुंबाकडे किल्ली दिलेली असावी. ग्राम पंचायत क्षेत्रात सार्वजनिक/समूह  शौचालयाचा वापर करणाऱ्या कुटुंबांचे एकूण प्रमाण ५ % हून अधिक नसावेत.
- प्रत्येक व्यक्तीकडून शौचालयाचा वापर
- उपलब्ध शौचालयाची तांत्रिक गुणवत्ता. योग्य विष्ठा व्यवस्थापनाची क्षमता
- अंगणवाडी,ग्रामपंचायत,आरोग्यकेंद्र,शाळा ई. सार्वजनिक ठिकाणी स्वच्छतागृहांची उपलब्धता

अशा प्रकारची स्वच्छता विषयक स्थिती असणाऱ्या ग्रामपंचायतिला ( गाव किंवा पाडा नाही) हागणदारी निर्मुलन उत्सव साजरा करता येईल मात्र त्या साठी सुचवलेल्या या स्थितीची खात्री स्थानिक ग्रामस्थ (गावसभेच्या माध्यामातून आणि तालुका यंत्रणेला करून घ्यावी लागेल.हागणदारी निर्मुलनाची ही पहीली पातळी गाठल्याची घोषणा सरपंच आणि गटविकास अधिकारी करतील.

**पातळी ०२ हागणदारीमुक्त ग्रामपंचायत घोषणा ( १२-१८ महिने )**

- पातळी ०१ चे सर्व निकष पूर्ण असावेत.
- सर्व कुटुंबांकडे किशोरवयीन मुली व महिलांची प्रतिष्ठा जपणारे योग्य,कायम स्वरूपातील बांधकाम असाणारे वापरायोग्य शौचालय
- ग्राम पंचायत क्षेत्रात सार्वजनिक/समूह शौचालयांचा वापर होत असल्यास या शौचालयाच्या दारावर वापर करणाऱ्या कुटुंबांची नावे लिहिलेली असावीत त्याच कुटुंबाकडे किल्ली दिलेली असावी. ग्राम पंचायत क्षेत्रात सार्वजनिक/समूह शौचालयाचा वापर करणाऱ्या कुटुंबांचे एकूण प्रमाण ५ % हून अधिक नसावेत.
- सर्व शौचालया शेजारी पाणी व साबणाची उपलब्धता
- सर्व कुटुंबातील सर्व व्यक्तीकडून महत्वाच्या वेळी साबणाने हात धुतले जातात
- लहान मुलांच्या विष्ठेचे सुयोग्य व्यवस्थापन
- कुटुंब स्तरावर घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनासंदर्भात जागरुकता व कार्यवाहीला सुरुवात.

अशा प्रकारची स्वच्छता विषयक स्थिती असणाऱ्या ग्रामपंचायतिला राज्याने नियुक्त केलेल्या त्रयस्थ संस्थेकडून/ जिल्ह्याच्या बाहेरील केआरसी कडून केलेल्या पाहणी अहवालाच्या आधारे जिल्ह्याकडून हागणदारी मुक्त ग्रामपंचायत असे घोषित केल्या जावू शकेल . तत्पूर्वी आंतरजिल्हा त्रयस्थ/ जिल्हा मुख्य साधन संस्थेकडून शिफारस केलेल्या प्रस्थावापैकी १० % प्रस्तावांची आंतरतालुका गटविकास अधिकाऱ्या कडून पडताळणी करुन घेवून ही घोषणा मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद हे करतील.

**पातळी ०३ हागणदारी मुक्त अधिक ( १८-२४ महिने )**

- पातळी ०१ व ०२ चे सर्व निकष पूर्ण असावेत
- घन कचरा संकलन व व्यवस्थापन व्यवस्थेची उपलब्धता.
- घन कचरयासाठी वर्गीकरण व्यवस्था व विघटनशील घनकचरयासाठी प्रक्रिया केंद्र उपलब्ध
- पिण्याच्या पाण्याची योग्य साठवण व हाताळणी ग्राम पंचायत क्षेत्रात सार्वजनिक/समूह शौचालयांचा वापर होत असल्यास या शौचालयाच्या दारावर वापर करणाऱ्या कुटुंबांची नावे लिहिलेली असावीत त्याच कुटुंबाकडे किल्ली दिलेली असावी. ग्राम पंचायत क्षेत्रात सार्वजनिक/समूह शौचालयाचा वापर करणाऱ्या कुटुंबांचे एकूण प्रमाण ५ % हून अधिक नसावेत.
- आरोग्यास घातक ( मैला मिश्रित ) सांडपाणी सार्वजनिक नाल्यात जाण्यापूर्वी त्यावर योग्य प्रक्रिया उपलब्ध
- शाळा व आरोग्य केंद्र स्तरावर मासिक पाळी स्वच्छता व्यवस्थापन सुविधा उपलब्ध

अशा प्रकारची स्वच्छता विषयक स्थिती असणाऱ्या ग्रामपंचायतिला ( गाव किंवा पाडा नाही) हागणदारी मुक्त अधिक दर्जा देता येईल. मात्र त्या साठी या स्थितीची खात्री राज्याने सुचवलेल्या त्रयस्थ संस्थेकडून /जिल्ह्याच्या केआरसी कडून करून घ्यावी लागेल. मुख्य साधन संस्थांनी शिफारस केलेल्या एकूण ग्रामपंचायतीच्या १० % ग्राम्पान्चायातींची पडताळणी आंतरजिल्हा मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडून करण्यात येईल आणि त्यानंतर हागणदारी मुक्त अधिक दर्जा गाठल्याची घोषणा राज्य सरकार करेल.

ग्रामपंचायत स्तरावरील प्रोत्साहन निधी आणि घनकचरा सांडपाणी व्यवस्थापन निधी वितरण हागणदारी निर्मूलनाच्या या विविध पातळ्या सोबत जोडावे म्हणजे त्या द्वारे ग्रामपंचायतीना हागणदारी निर्मुलन उपक्रमात सहभागी व्हायला प्रोत्साहन मिळू शकेल.

ग्रामपंचायतीतील बहुतांश कुटुंबाकडून स्वच्छता विषयक सवयींचा अंगीकार झाल्यानंतर उर्वरित समाज घटकावर अनुकरण करण्याचा सामाजिक व कायदेशीर दबाव निर्माण होण्यासाठी काही कायदेविषयक तरतुदी कराव्या लागतील.

राज्य स्तरावर संत गाडगेबाबा ग्रामस्वच्छता मोहिमेसारख्या उपक्रमांना स्वच्छ भारत मिशन मध्ये समाविष्ट करून त्यातील स्पर्धात्मक वातावरणाचा लाभ घेता येईल

**हागणदारी मुक्त ग्रामपंचायत टप्पा एक म्हणजे हागणदारी मुक्ती उत्सव. हा उत्सव ग्रामपंचायत स्थानिक पंचायत समिती यंत्रणेच्या मान्यतेने साजरा करू शकेल . यासाठी ग्रामपंचायत तालुका पंचायत समिती कडे रीतसर अर्ज सादर करेल आणि तालुका यंत्रणा संबंधित ग्रामपंचायतीची स्वच्छता विषयक पाहणी करून हागणदारी मुक्ती उत्सव साजरा करण्यास मान्यता देईल.**

**प्रपत्र २: हागणदारी मुक्त दर्जा टप्पा दोन साठी सहभागी ग्रामपंचायतीने जिल्हा यंत्रणेकडे पडताळणीसाठी सादर करावयाचा प्रस्ताव**

**१.ग्रामपंचायत प्राथमिक माहिती**

| | |
|---|---|
| ग्रामपंचायतीचे नाव | |
| तालुका | |
| जिल्हा | |
| अंतर्गत गावे/वाड्या | |
| सरपंचाचे नाव | |
| ग्रामसेवकाचे नाव | |
| लोकसंख्या (जनगणना२०११ ) | |
| हागणदारी निर्मुलन आराखडा तयार केल्याचा दिनांक | |
| पडताळणी प्रस्ताव टप्पा क्रमांक | |
| हागणदारीमुक्त ग्राप.पडताळणी प्राप्त - टप्पा व वर्ष | |
| निर्मलग्राम पडताळणी मिळाला असल्यास वर्ष | |

**२. स्वच्छता विषयक माहिती ( कुटुंब संख्या )**

| एकूण | शौचालय असणारी | शौचालय नसणारी | शौचालय वापरणारी | उघड्यावर जाणारी |
|---|---|---|---|---|
| | | | | |

**३ . स्वच्छता विषयक माहिती ( संस्थास्तर )**

**अ . शाळा**

| सुविधा तपशील | होय/नाही | | |
|---|---|---|---|
| | शाळा १ | शाळा २ | शाळा ३ |
| शाळेत मुला मुलीसाठी स्वतंत्र स्वच्छता गृह उपलब्ध | | | |
| शाळेतील मुला मुलींच्या प्रमाणात शौचालय व मुताऱ्या उपलब्ध | | | |
| शाळेतील स्वच्छता सुविधांचा विद्यार्थी व शिक्षकाकडून नियमित वापर | | | |
| शाळेत हात धुण्याच्या सुविधा,साबण,पाणी उपलब्ध | | | |
| शाळेतील स्वच्छता सुविधांची देखभाल दुरुस्ती नियमित | | | |
| शाळेत मासिकपाळी व्यवस्थापना संदर्भात पुरश्या व्यवस्था | | | |
| शाळेत स्वच्छता विषयक प्रशिक्षित शिक्षक | | | |
| स्वच्छता विषयक बाबीवर विद्यार्थ्यांचे प्रशिक्षण | | | |

**ब . अंगणवाडी**

| सुविधा तपशील | होय/नाही | | | |
|---|---|---|---|---|
| | अंगणवाडी . १ | २ | ३ | ४ |
| स्वच्छता गृह उपलब्ध | | | | |
| स्वच्छता सुविधांचा नियमित वापर | | | | |
| हात धुण्याच्या सुविधा,साबण,पाणी उपलब्ध | | | | |
| स्वच्छता सुविधांची देखभाल दुरुस्ती नियमित | | | | |
| अंगणवाडी सेविका स्वच्छता विषयक प्रशिक्षित | | | | |
| स्वच्छता विषयक बाबीवर मुलांचे उदबोधन | | | | |

**क . सार्वजनिक संस्था**

| सुविधा तपशील | होय/नाही | | | |
|---|---|---|---|---|
| | ग्रामपंचायत | आरोग्य केंद्र | समाज केंद्र | इतर |
| स्वच्छता गृह उपलब्ध | | | | |
| स्वच्छता सुविधांचा नियमित वापर | | | | |
| हात धुण्याच्या सुविधा,साबण,पाणी उपलब्ध | | | | |
| स्वच्छता सुविधांची देखभाल दुरुस्ती नियमित | | | | |

**४ . सांडपाणी व्यवस्थापन**

| | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | कुटुंब पातळीवर सांडपाणी व्यवस्थापन पद्धती | |
| २ | पाणी पुरवठा साधनांच्या ठिकाणी व्यवस्था | |
| ३ | सार्वजनिक ठिकाणी सांडपाणी व्यवस्था | |
| ५ | सांडपाणी वाहून नेण्याची व्यवस्था सर्वत्र | |
| ६ | सांडपाणी वाहून नेणाऱ्या नाल्या प्रवाही | |
| ७ | सांडपाण्यावर प्रक्रिया केली जाते | |
| ८ | सांडपाण्याचा पुनर्वापर होतो | |

**५ . घनकचरा व्यवस्थापन**

| क्र | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | कुटुंब पातळीवर घनकचरा व्यवस्थापन पद्धती | |
| २ | सार्वजनिक ठिकाणी घनकचरा संकलन सोय | |
| ३ | घनकचरा वाहून नेण्याची सोय | |
| ५ | घनकचरा प्रकारानुसार विभागणी | |
| ६ | विघटनशील कचऱ्यावर प्रक्रिया | |
| ७ | अविघटनशील कचऱ्याची व्यवस्था | |
| ८ | घनकचऱ्यावर आधारीत उद्योग | |

**६ . पिण्याच्या पाण्याचे सार्वजनिक व्यवस्थापन**

| क्र | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | पिण्याच्या पाण्याच्या सर्व स्त्रोताजवळचा परिसर स्वच्छ आहे का ? | |
| २ | पिण्याच्या पाण्याच्या सर्व स्त्रोताजवळ सांडपाणी वाहून नेणारी सोय आहे का ? | |
| ३ | पिण्याच्या पाण्याच्या सर्व स्त्रोताचे नियमित शुद्धीकरण होते का ? | |
| ४ | पिण्याच्या पाण्याची टाकी नियमित स्वच्छ केली जाते का ? | |
| ५ | पाणी वितरण व्यवस्थेची नियमित देखभाल केली जाते का ? | |
| ६ | पाणी गुणवत्ते संदर्भात हिरवे किंवा पिवळे कार्ड आहे का ? | |

## ७ . परिसर स्वच्छता व्यवस्थापन

| क्र | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | गावाचा परिसर स्वच्छ आहे का ? | |
| २ | सार्वजनिक रस्ते स्वच्छ आहेत का ? | |
| ३ | सार्वजनिक इमारती स्वच्छ आहे का ? | |
| ४ | सार्वजनिक मोकळ्या जागा स्वच्छ आहेत का ? | |
| ५ | सार्वजनिक परिसर स्वच्छ आहे का ? | |
| ६ | सार्वजनिक ठिकाणी घनकचरा आढळून येतो का ? | |
| ७ | सार्वजनिक ठिकाणी सांडपाणी आढळून येतो का ? | |
| ८ | सार्वजनिक ठिकाणी जनावरांचे मलमूत्र आढळून येतो का ? | |
| ९ | सार्वजनिक ठिकाणी मानवी विष्ठा आढळून येतो का ? | |

## ८ स्वच्छता विषयक माहिती ( कुटुंबस्तर )

| स्थळ | आहे/नाही |
|---|---|
| कुटुंबातील सर्व व्यक्तीकडून शौचालयाचा नियमित वापर | |
| सर्व कुटुंबातील सर्व व्यक्तीकडून महत्वाच्या वेळी हात धुण्यासाठी साबणाचा वापर | |
| सर्व शौचालया शेजारी पाणी व साबणाची उपलब्धता | |
| लहान मुलांच्या विष्ठेचे सुयोग्य व्यवस्थापन | |
| घन कचरा संकलन व व्यवस्थापन व्यवस्थेची उपलब्धता | |
| घनकचरा वर्गीकरण व्यवस्था व विघटनशील घनकचरा प्रक्रिया केंद्र | |
| पिण्याच्या पाण्याची योग्य साठवण व हाताळणी | |
| मैला मिश्रित सांडपाणी सार्वजनिक नाल्यात जाण्यापूर्वी त्यावर योग्य प्रक्रिया | |
| शाळा व आरोग्य केंद्र स्तरावर मासिक पाळी स्वच्छता व्यवस्थापन सुविधा उपलब्ध | |

## ९ स्वच्छता विषयक क्षमता बांधणी प्रशिक्षण, उदबोधन सहभाग माहिती

| स्थळ | झाले/नाही | असल्यास स्तर ( गाव/तालुका/जिल्हा) |
|---|---|---|
| ग्रामपंचायत सदस्य | | |
| पाणी पुरवठा व स्वच्छता समिती सदस्य | | |
| अंगणवाडी कार्यकर्ती मदतनीस | | |
| शालेय शिक्षक | | |
| शालेय विद्यार्थी | | |
| महिला बचत गट सदस्य | | |
| जलसूरक्षक,पाणीपुरवठा कर्मचारी | | |
| इतर ( ) | | |

**१० स्वच्छता विषयक संवाद उपक्रम माहिती**

| तपशील | झाले/नाही | विवरण |
|---|---|---|
| गृहभेटी | | |
| कलापथक | | |
| अभ्यास दौरा | | |
| फिल्म शो | | |
| लक्षगट चर्चा | | |
| प्रात्यक्षिक | | |
| इतर | | |

**११ पाठपुरावा व सनियंत्रण व्यवस्था माहिती**

| तपशील | आहे/नाही |
|---|---|
| मासिक स्वच्छता दिन साजरा होतो का ? | |
| हागणदारी निर्मुलन पाठपुरावा समिती आहे का ? | |
| शौचालय वापर देखरेख समिती आहे का ? | |
| वैयक्तिक शौचालय प्रगती नोंदवही अद्ययावत आहे का ? | |
| प्रगती नोंदवही आधारे मासिक अहवाल तयार होतो का ? | |
| प्रत्येक ग्रामसभेत स्वच्छता विषयक आढावा घेतला जातो का ? | |

**१२ .ग्रामपंचायत क्षेत्रातील हागणदारीमुक्त स्थिती कायम ठेवण्यासाठी केलेल्या उपाययोजना**

- ------------------------------------------------------------------------------------------
- ------------------------------------------------------------------------------------------
- ------------------------------------------------------------------------------------------
- ------------------------------------------------------------------------------------------

| | | |
|---|---|---|
| | | |
| दिनांक | ग्रामसेवक स्वाक्षरी | सरपंच स्वाक्षरी |

**प्रस्तावासोबत जोडलेली प्रपत्रे**

१ सहभागी ग्रामपंचायतीने पडताळणीसाठी सादर करावयाचा प्रस्ताव

२ हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळण प्रक्रियेत सहभागाला ग्रामसभेची मंजुरी ठराव पाणी व स्वच्छता विभागाने निर्धारित केलेले हागणदारीमुक्त ग्रामपंचायती संबंधीचे संबंधित टप्प्यासाठीचे निकष पूर्ण केला असल्याचा ग्रामसभेचा ठराव

**प्रपत्र ३: हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रियेत सहभागाला ग्रामसभेची मंजुरी ठराव**

**ग्रामसभा दिनांक** ---------------------------------

**ठराव क्रमांक** ----------------------------------

**ठरावाचे सूचक** ---------------------------------

**ठरावाचे अनुमोदक** ---------------------------------

## ठराव

आम्ही मौजे -------------- ग्रामपंचायत ----------------- ता.---------------- जि.----------------

येथील ग्रामसभेचे सदस्य असा ठराव करीत आहोत की, ग्रामपंचायत परिसर पूर्णत: हागणदारीमुक्त झाल्याच्या पार्श्वभूमीवर राज्य पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाच्या हागणदारीमुक्त ग्रामपंचायत टप्पा ----------- पडताळणीसाठी ग्रामपंचायतीचा प्रस्ताव जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कडे सदर करण्यात यावा.

ग्रामपंचायत सरपंच,सदस्य आणि उपस्थितांची नावे व स्वाक्षरी

1) --------------------------------------- ------------------------------------
2) --------------------------------------- ------------------------------------
3) --------------------------------------- ------------------------------------
4) --------------------------------------- ------------------------------------
5) --------------------------------------- ------------------------------------
6) --------------------------------------- ------------------------------------
7) --------------------------------------- ------------------------------------
8) --------------------------------------- ------------------------------------
9) --------------------------------------- ------------------------------------

**प्रपत्र ४: राज्याच्या पाणी व स्वच्छता विभागाने निर्धारित केलेले हागणदारी मुक्त ग्रामपंचायती संबंधीचे संबंधित टप्प्यासाठीचे निकष पूर्ण केला असल्याचा ग्रामसभेचा ठराव**

**ग्रामसभा दिनांक** ---------------------------------

**ठराव क्रमांक** ----------------------------------

**ठरावाचे सूचक** ---------------------------------

**ठरावाचे अनुमोदक** ---------------------------------

## ठराव

आम्ही मौजे -------------- ग्रामपंचायत ----------------- ता.---------------- जि.----------------

येथील ग्रामसभेचे सदस्य असा ठराव करीत आहोत की, ग्रामपंचायत परिसर पूर्णत: हागणदारीमुक्त झाला असून राज्य पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाच्या हागणदारीमुक्त ग्रामपंचायत टप्पा ------ पडताळणीसाठी निर्धारित केलेले पुढील सर्व निकष ग्रामपंचायतीने पूर्ण केले आहेत

- -------------------------------------------------------------------------
- -------------------------------------------------------------------------
- -------------------------------------------------------------------------
- -------------------------------------------------------------------------

ग्रामपंचायत सरपंच,सदस्य आणि उपस्थितांची नावे व स्वाक्षरी

1) --------------------------------------    ------------------------------------
2) --------------------------------------    -----------------------------------

**प्रपत्र ५ :जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत छानणी समितीकडून हागणदारीमुक्त पडताळणी प्रस्ताव छानणी**

जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत हागणदारी मुक्त ग्रामपंचायत छानणी समितीकडून -------------------- ग्रामपंचायतीच्या हागणदारीमुक्त पडताळणी प्रस्तावाची छानणी दि ------------------------------ च्या समिती बैठकीत करण्यात आली.छानणीच्या दरम्यान पुढील बाबी तपासण्यात आल्या-

| पडताळणी संदर्भ | आहे/नाही |
|---|---|
| ग्रामपंचायतीचा हागणदारीमुक्त दर्जासाठी परिपूर्ण प्रस्ताव | |
| पुरस्कारासाठी सहभाग घ्यावयाचा आहे त्या टप्प्यासाठी घोषित करण्यासंदर्भात निर्धारित केलेले निकष पूर्ण केले असल्याचा ग्रामसभेचा ठराव | |
| हागणदारीमुक्त ग्रामपंचायत हागणदारीमुक्त दर्जा योजनेत सहभाग घेण्याला ग्रामसभेची मंजुरी देणारा ठराव | |
| त्रयस्थ/मुख्य साधन संस्था कडून प्रस्ताव पडताळणी आधारे प्राप्त झालेली शिफारस | |
| जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत छानणी समितीच्या किमान तीन सदस्याचा प्रत्यक्ष ग्रामपंचायत भेटी आधारे पुरस्कारासाठी शिफारस अहवाल | |
| प्रस्तावातील आकडेवारी ऑन /ऑफ लाईन माहिती प्रणालीशी सुसंगत | |
| त्रयस्थ संस्थेकडून/ जिल्ह्याच्या केआरसी कडून केलेल्या पाहणीचा अहवाल | |

हागणदारीमुक्त ग्रामपंचायती पडताळणी टप्पा -----साठी --------ग्रामपंचायत,ता.------ जि .------ यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत हागणदारी मुक्त ग्रामपंचायत हागणदारीमुक्त दर्जा छानणी समितीकडून सविस्तर छानणी झाली असून हि समिती ------ ग्रामपंचायतीची हागणदारीमुक्त टप्पा --- साठी शिफारस करीत आहे.

**जिल्हा स्तरीय छाणनी तथा सुकाणू समितीची रचना**

| क्र | नाव | पद | समिती पद | स्वाक्षरी |
|---|---|---|---|---|
| १ | | मुख कार्यकारी अधिकारी | अध्यक्ष | |
| २ | | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) | सदस्य | |
| ३ | | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) | सदस्य | |
| ४ | | कार्यकारी अभियंता (पाणीपुरवठा) | सदस्य | |
| ५ | | जिल्हा कार्यक्रम व्यवस्थापक | सदस्य | |
| ६ | | जिल्हा कक्षातील सल्लागार (०१) | सदस्य | |
| ७ | | जिल्हा मुख्य साधन संस्था प्रतिनिधी | सदस्य | |

## प्रपत्र ६ : हागणदारीमुक्त ग्रामपंचायत प्रस्ताव पडताळणी- त्रयस्थ/मुख्य साधन संस्था ToR

**पार्श्वभूमी:** महाराष्ट्र राज्यात स्वच्छ भारत मिशन या महत्वाकांक्षी कार्यक्रमाची अंमलबजावणी होत असून या अंतर्गत २ ऑक्टोबर २०१९ पर्यंत राज्यातील सर्व ग्रामपंचायती हागणदारीमुक्त करण्याचा निर्धार करण्यात आला आहे.राज्यातील ग्रामीण जनतेच्या आरोग्यमानात सुधारणा घडवणे आणि त्यांना गुणवत्तापूर्ण जीवन जगण्यासाठी पोषक वातावरण निर्माण करण्याचा या कार्यक्रमाचा प्रमुख हेतू आहे. ग्रामपंचायत हागणदारीमुक्त करण्याच्या प्रक्रियेत अधिकाधिक ग्रामपंचायतीनी सहभागी व्हावे आणि त्यांच्या या सहभागाला प्रोत्साहन मिळावे या हेतूने राज्याच्या पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाने हागणदारीमुक्त होणाऱ्या ग्रामपंचायतीना तीन वेगवेगळ्या टप्प्यावरील उपलब्धीसाठी दर्जा देण्याचे निश्चित केले आहे. टप्पा २ व ३ हागणदारीमुक्त ग्रामपंचायत दर्जासाठी पात्र ग्रामपंचायतीची निवड राज्यस्तरीय मुख्य साधन संस्था कडून करून घेण्याचे विभागाने ठरवले असून या कामात सहभागी होवू इच्छिणाऱ्या मुख्य साधन संस्थासाठी हागणदारीमुक्त ग्रामपंचायत प्रस्ताव पडताळणी संबधी सविस्तर माहिती देत आहोत.

**कामाचे स्वरूप:** स्वच्छ भारत मिशन अंतर्गत हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी साठी इच्छुक ग्रामपंचायती विहित नमुन्यात आपला प्रस्ताव आवश्यक जोडपत्रासह जिल्हा पाणी व स्वच्छता कक्षाकडे सादर करतील. जिल्हा कक्ष या प्रस्तावाची त्रयस्थ/ मुख्य साधन संस्थेकडून पडताळणी करून घेतील. संस्थांकडून उपलब्ध झालेल्या पडताळणी अहवाला आधारे जिल्हास्तर छाननी समिती शिफारस करेल. संबंधित ग्रामपंचायतिने टप्पा २ दर्जा प्राप्त केल्याची घोषणा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे करतील. प्राप्त प्रस्तावांपैकी जे प्रस्ताव तालुकास्तरीय समिती शिफारसीसह जिल्हा कक्षाकडे पाठवेल अशा प्रस्तावांची छानणी जिल्हास्तरीय समिती करेल. जिल्हास्तरीय समितीने शिफारस केलेले प्रस्ताव जिल्हाकक्षाकडून राज्यस्तरावर पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) कडे पाठविले जातील. राज्यस्तरावर हागणदारीमुक्त ग्रामपंचायत दर्जा पडताळणीसाठी निश्चित केलेल्या राज्य मुख्य साधन संस्थेकडून या प्रस्तावित ग्रामपंचायतीची पडताळणी केल्या जाईल आणि या राज्य मुख्य साधन संस्था त्यांनी केलेल्या पाहणीवर आधरित अहवाल आणि हागणदारीमुक्त ग्रामपंचायत टप्पा ३ साठी पात्र ग्रामपंचायतीची यादी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेकडे(वासो) सादर करतील. हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रिया वर्षातून केवळ एकदा राबविली जाईल.

**राज्यस्तर पडताळणी संस्था- मनुष्यबळ आणि इतर उपलब्धता:** हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रियेत अंतिम पडताळणी करून शिफारस करणाऱ्या संस्थेच्या जेष्ठ कार्यकर्त्याने समन्वयक म्हणून काम करणे अपेक्षित आहे. समन्वयक प्रस्ताव पडताळणी करणाऱ्या गटांशी नियमित संपर्कात राहून त्यांना मार्गदर्शन करेल आणि त्याच बरोबर जिल्हा पाणी व स्वच्छता कक्ष आणि पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) सोबत समन्वयातून त्या त्या जिल्ह्यातील प्रस्ताव पडताळणीचे काम करेल.
हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी संदर्भातील प्रगती,आकडेवारी,अहवाल ई. संबधी पत्रव्यवहार व संपर्काची जबाबदारी समन्वयकाची राहील.

प्रस्ताव पडताळणीचे काम निर्धारित वेळेत पूर्ण करत येईल या दृष्टीने पडताळणी करणाऱ्या राज्य मुख्य साधन संस्था पर्याप्त प्रमाणात सर्वेक्षण गट उपलब्ध करून घेतील.प्रत्येक पडताळणी गटात एक पर्यवेक्षक आणि दोन माहिती संकलक असणे गरजेचे असून ग्रामपंचायतीच्या कुटुंब संख्येनुसार त्यात आवश्यकतेनुसार वाढ करावी

लागेल. सर्वेक्षण गटातील सर्व सदस्य पदवीधर असणे आवश्यक असून या सर्वांची स्थानिक भाषेची समज चागली असावी.प्रस्ताव पडताळणी संस्थेकडे पर्याप्त मनुष्यबळ आणि कार्यालयीन साधनसामुग्री ( संगणक,इंटरनेट,वाहन ई.) उपलब्ध असावी. हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रक्रिया कालबद्ध असल्याच्या पार्श्वभूमीवर पडताळणी संस्थाना वेळेचे बंधन पाळावे लागेल तसेच पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेकडे(वासो) याच्यासोबत समन्वय ठेवावा लागेल. प्रस्ताव पडताळणी कामात सहभागी संस्थांच्या कामाच्या प्रगती नुसार व गरजेनुसार त्यांच्याकडील प्रस्ताव पडताळणीचे काम वाढविण्यात येवू शकेल.

**प्रस्ताव पडताळणी कामाची व्याप्ती:** प्रत्येक सहभागी प्रस्ताव पडताळणी संस्थेकडे द्यावयाच्या प्रस्तावांची संख्या संस्थेची क्षमता आणि प्रस्तावांची संख्या यावर अवलंबून असेल.या संबंधीचे सर्व निर्णय राज्यस्तरावर पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) घेईल

**प्रस्ताव पडताळणी क्षेत्र:** पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) प्रस्ताव पडताळणीसाठी मुख्य साधन संस्थाना जिल्ह्याचे वाटप करून देईल. पडताळणी कामात सहभागी संस्थाना राज्यातील कुठल्याही जिल्ह्यात काम करावे लागेल.

**प्रस्ताव पडताळणी कामाचे सनियंत्रण:**प्रस्ताव पडताळणी कामाच्या गुणवत्तेचे सनियंत्रण करण्यासाठी : पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) राज्यस्तरावर स्वतंत्र व्यवस्था निर्माण करेल. या कामासाठी प्रधान किंवा राज्यस्तर साधनसंस्थांची अनुभव आणि संसाधनांच्या पार्श्वभूमीवर निवड केल्या जाईल.

**प्रस्ताव पडताळणी संस्थाकडून कामाची विभागणी:** प्रस्ताव पडताळणीचे काम दिलेल्या संस्थेला स्वत: संस्थास्तरावरच करावे लागेल. पडताळणी संस्था आपल्याकडील काम इतर संस्था/व्यक्तीकडून करून घेवू शकणार नाही. पडताळणी संस्थांनी आपले काम इतर संस्था/व्यक्ती कडे दिलेले आढळल्यास त्या संस्थेचे काम काढू घेण्यात येईल आणि अशा संस्थेला काळ्या यादीत टाकले जाईल.

**प्रस्ताव पडताळणी संस्था कडील कामे:** हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रस्ताव पडताळणी करणाऱ्या संस्थाना पुढील कामे करावी लागतील

- हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रस्तावाची प्रत्यक्ष भेट देवून पडताळणी
- विहित नमुन्यात हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रस्ताव पडताळणी अहवाल
- प्रस्ताव पडताळणी दरम्यान काढलेली पुढील छायाचित्रे.
    - ग्रामपंचायत कार्यालय पडताळणी गट व ग्रामपंचायत सदस्य
    - उघड्यावर विष्ठाआढळल्यास त्या जागेचे छायाचित्र
    - शाळा, अंगणवाडी स्वच्छतागृह
    - सांडपाणी व्यवस्थापन स्थिती दाखविणारी छायाचित्रे
    - घनकचरा व्यवस्थापन स्थिती दाखविणारी छायाचित्रे
    - सार्वजनिक हातपंपाजवळची स्वच्छता स्थिती दाखविणारी छायाचित्रे
    - सार्वजनिक स्वच्छतेची स्थिती दाखविणारी छायाचित्रे

- प्रस्ताव पडताळणीचा सविस्तर एकत्रित अहवाल – निरीक्षणे, सूचना,अनुभव ई.

**प्रस्ताव पडताळणी कामाचे शुल्क आणि वितरण:** प्रस्ताव पडताळणीच्या कामासाठी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) ग्रामपंचायतीच्या कुटुंब संख्येनुसार प्रस्ताव पडताळणीचे शुल्क वितरीत करेल. कुटुंब संख्येनुसार शुल्क रक्कम पुढील प्रमाणे असेल.

| क्र | कुटुंब संख्या | पडताळणी शुल्क | | कुटुंब सर्वेक्षण संख्या |
|---|---|---|---|---|
| | | जिल्हास्तर | राज्यस्तर | |
| १ | २०० पर्यंत | ३००० | ४००० | २०% |
| २ | २०१ ते ३०० | ३००० | ४००० | २०% |
| ३ | ३०१ ते ५०० | ३००० | ४००० | २०% |
| ४ | ५०१ ते ९९९ | ४००० | ५००० | २०% |
| ५ | १००० ते २००० | ४००० | ५००० | २०% ( कमाल २००) |
| ६ | २००१ ते ४९९९ | ४००० | ५००० | २०% ( कमाल २००) |
| ७ | ५००० व अधिक | ४००० | ५००० | २०% ( कमाल २००) |

प्रस्ताव पडताळणीचे शुल्क पडताळणी संस्थाना तीन हप्त्यात वितरीत केले जाईल. तसेच राज्यस्तर व जिल्हास्तर घोषनेसाठीचे पडताळणी शुल्क पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) यांचेकडून संकलित व वितरीत केले जाईल.

| हप्ता | कामाची स्थिती | हप्त्याची रक्कम |
|---|---|---|
| ०१ | ३०% प्रस्तावाचे पडताळणी अहवाल सादर | एकूण रकमेच्या ३०% |
| ०२ | ७० % प्रस्तावाचे पडताळणी अहवाल सादर | एकूण रकमेच्या ४०% |
| ०३ | १०० % प्रस्तावाचे पडताळणी अहवाल सादर | एकूण रकमेच्या ३०% |

- **प्रपत्र ७ : राज्यस्तरीय मुख्य साधन संस्थाकडून प्रस्ताव पडताळणी**

राज्यस्तर मुख्य साधन संस्था हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी प्रस्तावांची पडताळणी पुढील प्रपत्रा आधारे करतील. ही पडताळणी दोन टप्प्यात असून पडताळणीसाठीही प्रपत्रात स्वतंत्र पडताळणी सूची उपलब्ध करून देण्यात आली आहे.

## हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी  पडताळणी सूची

### १.ग्रामपंचायत प्राथमिक माहिती

| विवरण | तपशील |
|---|---|
| ग्रामपंचायतीचे नाव | |
| तालुका | |
| जिल्हा | |
| अंतर्गत गावे/वाड्या | |
| सरपंचाचे नाव | |
| ग्रामसेवकाचे नाव | |
| लोकसंख्या (जनगणना२०११ ) | |
| हागणदारी निर्मुलन आराखडा तयार केल्याचा दिनांक | |
| निर्मलग्राम पडताळणी मिळाला असल्यास वर्ष | |
| हागणदारीमुक्त ग्राप.पडताळणी   प्राप्त - टप्पा व वर्ष | |

### २. स्वच्छता विषयक  माहिती ( कुटुंब संख्या )

| तपशील | एकूण कुटुंब | शौचालय असणारी | शौचालय नसणारी | शौचालय वापरणारी | उघड्यावर जाणारी |
|---|---|---|---|---|---|
| प्रस्तावातील माहिती | | | | | |
| वै.शौचालय प्रगती नोंदवहीतील नोंदीनुसार | | | | | |
| प्रत्यक्ष भेटीत मिळालेली माहिती | | | | | |

### ३ . स्वच्छता विषयक  माहिती ( संस्थास्तर )

### अ . शाळा

| सुविधा तपशील | होय/नाही | | |
|---|---|---|---|
| | शाळा १ | शाळा २ | शाळा ३ |
| शाळेत मुला मुलीसाठी स्वतंत्र स्वच्छता गृह उपलब्ध | | | |
| शाळेतील मुला मुलींच्या प्रमाणात शौचालय व मुताऱ्या उपलब्ध | | | |
| शाळेतील स्वच्छता सुविधांचा विद्यार्थी व शिक्षकाकडून नियमित वापर | | | |
| शाळेत हात धुण्याच्या सुविधा,साबण,पाणी उपलब्ध | | | |
| शाळेतील  स्वच्छता सुविधांची देखभाल दुरुस्ती नियमित | | | |
| शाळेत मासिकपाळी व्यवस्थापना संदर्भात पुरश्या व्यवस्था | | | |
| शाळेत स्वच्छता विषयक प्रशिक्षित शिक्षक | | | |
| स्वच्छता विषयक बाबीवर विद्यार्थ्यांचे प्रशिक्षण | | | |

**ब . अंगणवाडी**

| सुविधा तपशील | होय/नाही | | |
|---|---|---|---|
| | अंग. १ | अंग. २ | अंग. ३ |
| स्वच्छता गृह उपलब्ध | | | |
| स्वच्छता सुविधांचा नियमित वापर | | | |
| हात धुण्याच्या सुविधा,साबण,पाणी उपलब्ध | | | |
| स्वच्छता सुविधांची देखभाल दुरुस्ती नियमित | | | |
| अंगणवाडी सेविका स्वच्छता विषयक प्रशिक्षित | | | |
| स्वच्छता विषयक बाबीवर मुलांचे उदबोधन | | | |

**क . सार्वजनिक संस्था**

| सुविधा तपशील | होय/नाही | | | |
|---|---|---|---|---|
| | ग्रामपंचायत | आरोग्य केंद्र | समाज केंद्र | इतर |
| स्वच्छता गृह उपलब्ध | | | | |
| स्वच्छता सुविधांचा नियमित वापर | | | | |
| हात धुण्याच्या सुविधा,साबण,पाणी उपलब्ध | | | | |
| स्वच्छता सुविधांची देखभाल दुरुस्ती नियमित | | | | |

**४ . सांडपाणी व्यवस्थापन**

| क्र | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | कुटुंब पातळीवर सांडपाणी व्यवस्थापन पद्धती कुठली ? | |
| २ | पाणी पुरवठा साधनांच्या ठिकाणी व्यवस्था कशी आहे? | |
| ३ | सार्वजनिक ठिकाणी सांडपाणी व्यवस्था काय आहे? | |
| ५ | सांडपाणी वाहून नेण्याची व्यवस्था सर्वत्र आहे का ? | |
| ६ | सांडपाणी वाहून नेणाऱ्या नाल्या प्रवाही आहेय का ? | |
| ७ | सांडपाण्यावर प्रक्रिया केली जाते का ? | |
| ८ | सांडपाण्याचा पुन:र्वापर होतो का ? | |

**५ . घनकचरा व्यवस्थापन**

| क्र | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | कुटुंब पातळीवर घनकचरा व्यवस्थापन पद्धती कुठली ? | |
| २ | सार्वजनिक ठिकाणी घनकचरा संकलन सोय आहे? | |
| ३ | घनकचरा वाहून नेण्याची सोय आहे का ? | |
| ५ | घनकचरा प्रकारानुसार विभागला जातो का ? | |

| | | |
|---|---|---|
| ६ | विघटनशील कचऱ्यावर प्रक्रिया केली जाते काय ? | |
| ७ | अविघटनशील कचऱ्याची व्यवस्था कशी लावली जाते ? | |
| ८ | घनकचऱ्यावर आधारीत उद्योग आहेत काय ? | |

### ६ . पिण्याच्या पाण्याचे सार्वजनिक व्यवस्थापन

| क्र | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | पिण्याच्या पाण्याच्या सर्व स्रोताजवळचा परिसर स्वच्छ आहे का ? | |
| २ | पिण्याच्या पाण्याच्या सर्व स्रोताजवळ सांडपाणी वाहून नेणारी सोय आहे का ? | |
| ३ | पिण्याच्या पाण्याच्या सर्व स्रोताचे नियमित शुद्धीकरण होते का ? | |
| ४ | पिण्याच्या पाण्याची टाकी नियमित स्वच्छ केली जाते का ? | |
| ५ | पाणी वितरण व्यवस्थेची नियमित देखभाल केली जाते का ? | |

### ७ . परिसर स्वच्छता व्यवस्थापन

| क्र | विवरण | तपशील |
|---|---|---|
| १ | गावाचा परिसर स्वच्छ आहे का ? | |
| २ | सार्वजनिक रस्ते स्वच्छ आहेत का ? | |
| ३ | सार्वजनिक इमारती स्वच्छ आहे का ? | |
| ४ | सार्वजनिक मोकळ्या जागा स्वच्छ आहेत का ? | |
| ५ | सार्वजनिक परिसर स्वच्छ आहे का ? | |
| ६ | सार्वजनिक ठिकाणी घनकचरा आढळून येतो का ? | |
| ७ | सार्वजनिक ठिकाणी सांडपाणी आढळून येतो का ? | |
| ८ | सार्वजनिक ठिकाणी जनावरांचे मलमूत्र आढळून येतो का ? | |
| ९ | सार्वजनिक ठिकाणी मानवी विष्ठा आढळून येतो का ? | |

### ८ . स्वच्छता विषयक माहिती ( कुटुंबस्तर )

| स्थळ | आहे/नाही |
|---|---|
| सर्व कुटुंबातील सर्व व्यक्तीकडून महत्वाच्या वेळी हात धुण्यासाठी साबणाचा वापर | |
| सर्व शौचालया शेजारी पाणी व साबणाची उपलब्धता | |
| लहान मुलांच्या विष्ठेचे सुयोग्य व्यवस्थापन | |
| घन कचरा संकलन व व्यवस्थापन व्यवस्थेची उपलब्धता | |
| घनकचरा वर्गीकरण व्यवस्था व विघटनशील घनकचरयासाठी प्रक्रिया केंद्र | |
| पिण्याच्या पाण्याची योग्य साठवण व हाताळणी | |
| मैला मिश्रित सांडपाणी सार्वजनिक नाल्यात जाण्यापूर्वी त्यावर योग्य प्रक्रिया | |
| शाळा व आरोग्य केंद्र स्तरावर मासिक पाळी स्वच्छता व्यवस्थापन सुविधा उपलब्ध | |

## ९ पाठपुरावा व सनियंत्रण व्यवस्था माहिती

| तपशील | आहे / नाही | फोटो,बातम्या,चर्चा,अहवाल,रेकॉर्ड द्वारे पडताळणी शेरा ( योग्य/अयोग्य ) |
|---|---|---|
| दरमहा स्वच्छता दिन | | |
| हागणदारी निर्मुलन पाठपुरावा समिती | | |
| शौचालय वापर देखरेख समिती | | |
| वै. शौचालय प्रगती नोंदवही अद्ययावत | | |
| प्रगती नोंदवही आधारे मासिक अहवाल | | |

## १० कुटुंबस्तर सर्वेक्षण

ग्रामपंचायत ----------------------- ता ----------------------------- जि ----------------------------- दिनांक --------------------------

| क्र | कुटुंब प्रमुख | कुटुंब सदस्य संख्या | शौचालय वापर | | | | | | पिण्याचे पाणी | | घनकचरा | | सांडपाणी योग्य व्यवस्था | कुटुंबात वैयक्तिक स्वच्छता सवयी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | आहे/नाही | प्रकार | लहान मुलांसह सर्वांकडून वापर | साबण | पाणी | देखभाल | उंचावर | ओगराले /तोटी | वर्गीकरण | व्यवस्थापन | आहे/नाही | आहेत/नाहीत | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | |

## २ हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी

| टप्पा | निकष | निकष संबंधी स्थिती | | |
|---|---|---|---|---|
| | | परिपूर्ण | साधारण | अयोग्य |
| ०१ | ग्रामसभेने मंजूर केलेला हागणदारी निर्मूलनाचा कृती आराखडा | | | |
| | किमान ७५-८०$ % कुटुंबांकडे शौचालयांची उपलब्धता | | | |
| | शौचालयांच्या उपलब्धतेहून अधिक महत्व प्रत्येकाकडून नियमीत वापर व देखरेख | | | |
| | उघड्यावर शौच न आढळणे | | | |
| | ग्रामपंचायत क्षेत्रातील प्रत्येक व्यक्तीकडून शौचालयाचा वापर | | | |
| | विष्ठा व्यवस्थापानासाठी उपलब्ध शौचालयाची तांत्रिक गुणवत्ता | | | |
| | अंगणवाडी,ग्रामपंचायत,आरोग्यकेंद्र,शाळा ई.सार्वजनिक ठिकाणी स्वच्छतागृहांची उपलब्धता | | | |
| ०२ | सर्व कुटुंबांकडे किशोरवयीन मुली व महिलांची प्रतिष्ठा जपणारे योग्य,कायम स्वरूपातील बांधकाम असणारे वापरायोग्य शौचालय | | | |
| | सर्व कुटुंबातील सर्व व्यक्तीकडून महत्वाच्या वेळी साबणाने हात धुतले जातात | | | |
| | सर्व शौचालया शेजारी पाणी व साबणाची उपलब्धता | | | |
| | लहान मुलांच्या विष्ठेचे सुयोग्य व्यवस्थापन | | | |
| | घन कचरा संकलन व व्यवस्थापन व्यवस्थेची उपलब्धता | | | |
| ०३ | घन कचरयासाठी वर्गीकरण व्यवस्था व विघटनशील घनकचरयासाठी प्रक्रिया केंद्र उपलब्ध | | | |
| | पिण्याच्या पाण्याची योग्य साठवण व हाताळणी | | | |
| | आरोग्यास घातक ( मैला मिश्रित ) सांडपाणी सार्वजनिक नाल्यात जाण्यापूर्वी त्यावर योग्य प्रक्रिया उपलब्ध | | | |
| | शाळा व आरोग्य केंद्र स्तरावर मासिक पाळी स्वच्छता व्यवस्थापन सुविधा उपलब्ध | | | |

### हागणदारीमुक्त ग्रामपंचायत दर्जा पात्रता स्थिती

| टप्पा ०१ | टप्पा ०२ | टप्पा ०३ |
|---|---|---|
| | | |

दिनांक ----------------------------          प्रस्ताव पडताळणी समन्वयक स्वाक्षरी

**प्रपत्र ८ :राज्य पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभागाच्या अंतर्गत राज्यस्तरीय हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी सुकाणू समिती कडून प्रस्तावांचा आढावा व मंजुरी**

राज्य पाणी पुरवठा आणि स्वच्छता विभाग अंतर्गत हागणदारी मुक्त ग्रामपंचायत पुरास्कर सुकाणू समितीकडून -------------------- ग्रामपंचायतीच्या हागणदारीमुक्त ग्रामपंचायत पडताळणी टप्पा ३ साठीचा प्रस्ताव दि ------------------------------ च्या सुकाणू समिती बैठकीत मुख्य साधन संस्था शिफारसीसह सादर करण्यात आला. सुकाणू समिती सदस्यांनी चर्चेअंती सादर प्रस्ताव मान्य करून ------------ ग्रामपंचायतीला हागणदारी मुक्त ग्रामपंचायत टप्पा ------------ दर्जा देण्याचे निश्चित केले आहे. स्मृतिचिन्ह, देवून ------------- ग्रामपंचायतीचा सन्मान करण्यास मान्यता दिली आहे.

| क्र | नाव | पद | समिती पद | स्वाक्षरी |
|---|---|---|---|---|
| १ | | मा. प्रधान सचिव , पाणी व स्वच्छता विभाग | अध्यक्ष | |
| २ | | उपसचिव , पाणी व स्वच्छता विभाग | उपाध्यक्ष | |
| ३ | | संचालक,वासो | सदस्य सचिव | |
| ४ | | राज्य स्वच्छता समन्वयक | सदस्य | |
| ५ | | राज्यस्तर तज्ञ सल्लागार | सदस्य | |
| ६ | | राज्यस्तर तज्ञ सल्लागार | सदस्य | |
| ७ | | कक्ष अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (पापु-8) | सदस्य | |
| ८ | | युनिसेफ पर्तिनिधी | सदस्य | |
| ९ | | साधन संस्था प्रतिनिधी | सदस्य | |